**महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा),**
**गट-अ मधील अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत.**
**उपसंचालक व तत्सम पदे**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली ३११७/प्र.क्र.१०९/प्रशा-२.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १२ जुलै, २०१७

वाचा:- शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.ईएसटी-३९१७/ प्र.क्र.४६/ प्रशा-२, दिनांक १७.३.२०१७.

**-शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हा दि. १ जुलै, २००६ पासून अंमलात आला आहे. सदर अधिनियमातील कलम ६ नुसार बदली करण्याबाबत सक्षम प्राधिकारी घोषित करण्यात आले आहेत. तसेच या कलमाच्या परंतुक २ नुसार बदली करणा-या सक्षम प्राधिका-याला, सर्वसाधारण व विशेष आदेशाद्वारे या कलमाखाली त्याचे अधिकार त्यांच्या कोणत्याही दुय्यम प्राधिका-याकडे सोपविता येतील अशी तरतूद करण्यात आलेली आहे.

२. महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ व ब मधील विविध संवर्गातील अधिका-यांची बदलीने पदस्थापना सक्षम प्राधिका-यांच्या पूर्वमान्यतेने करण्यात येत आहे. खालील तक्त्यात नमूद केलेल्या अधिका-यांची त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.आर.बी.गिरी | विभागीय सचिव, म.रा.मा.व उ.मा.शि.मंडळ,कोकण विभाग, रत्नागिरी | शिक्षण उपसंचालक, मा.व उ.मा.शि. संचा., म.रा. पुणे |

३. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक- सीडीआर १०८२/ २५६७/ २८/ अकरा , दि. ३० ऑगस्ट १९९२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. आयुक्त ( शिक्षण ), पुणे यांनी संदर्भाधीन आदेशात नमूद केल्याप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर आदेश बदली अधिनियम २००५ मध्ये नमूद कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१२१३११३६२०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2017.07.12 13:08:52 +05'30'

**( र.प्र. आटे)**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, शिक्षण,महाराष्ट्र राज्य,पुणे
२. संबंधित जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
३. सर्व संचालक
४. सर्व विभागीय अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्य. व उच्च माध्य. शिक्षण मंडळ
५. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. संबंधित अधिकारी (शिक्षण आयुक्तालयामार्फत)

**प्रत माहितीस्तव,**

१. मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी
२. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/ विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक
३. सर्व विधानपरिषद सदस्य/ विधानसभा सदस्य यांचे स्वीय सहायक
४. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
५. निवडनस्ती, प्रशा-२